**अनैतिक व्यापारास प्रतिबंध करण्याकरिता राज्यस्तरीय सनियंत्रण (Monitoring) समिती व सल्लागार (Advisory) समिती स्थापन करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : एएचटी-०४१२/प्र.क्र.२०४/भाग-१/विशा-६**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक - २७ जुलै, २०१७.

**वाचा -**

१) शासन निर्णय, गृह विभाग क्र.पीपीए-०६०४/एमएच ५९/प्रक्र.९०/विशा-६, दिनांक २३.२.२००५.
२) शुध्दीपत्रक, गृह विभाग क्र.पीपीए-०६०४/एमएच ५९/प्रक्र.९०/विशा-६, दिनांक १८.७.२००५.
३) शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग क्र.एसपीए-२००७/प्रक्र.३९/का.३, दिनांक १.२.२००८.
४) शासन निर्णय, गृह विभाग क्र.एएचटी-०४१२/प्रक्र.२०४/भाग-१/विशा-६, दिनांक १७.७.२०१२.
५) शासन निर्णय, गृह विभाग क्र.एएचटी-०४१२/प्रक्र.२०४/भाग-१/विशा-६, दिनांक १९.९.२०१५.

**प्रस्तावना :-**

बाजारु लैंगिक शोषणाच्या विळख्यात अडकलेल्या महिलांची सुटका, पुनर्वसन आणि पुर्नएकात्मिकरण करण्यासंदर्भातील बाबींचे समन्वय करण्याकरिता संदर्भ क्र.१ नुसार राज्यस्तरीय सल्लागार समिती स्थापन करण्यात आली होती. सदर राज्यस्तरीय सल्लागार समितीचे विस्तार करुन संदर्भ क्र.३ नुसार महिला व बाल विकास विभागाने विस्तारीत समितीची स्थापना केली होती. अनैतिक व्यापारास प्रतिबंध करण्यासाठी राज्य गुन्हे अन्वेषण विभागात दि.३१.३.२००८ रोजी अनैतिक मानवी वाहतूक प्रतिबंध समन्वय कक्षाची स्थापना करण्यात आली. अनैतिक मानवी वाहतूक प्रतिबंध संदर्भातील विषयाचे समन्वय व सनियंत्रण करण्यासाठी अपर मुख्य सचिव (गृह) यांच्या अध्यक्षतेखाली सनियंत्रण व सल्लागार समितीची स्थापना संदर्भ क्र.४ नुसार करण्यात आली व सदर समितीचे पुनर्गठण संदर्भ क्र.५ नुसार करण्यात आले होते.

अनैतिक व्यापारास प्रतिबंध करण्याकरिता स्थापित राज्यस्तरीय सल्लागार समितीची दि.८.८.२०१६ रोजी अपर मुख्य सचिव (गृह) यांच्या अध्यक्षतेखाली बैठक आयोजित करण्यात आली होती. सदर बैठकीमध्ये सर्वसमावेशक शासन निर्णय गृह विभागाने महिला व बाल विकास विभागाच्या अपर मुख्य सचिव यांचे सहमतीने निर्गमित करावा असा निर्णय घेण्यात आला. सदर बैठकीमध्ये ठरल्याप्रमाणे अनैतिक मानवी वाहतूक प्रतिबंध संदर्भातील विषयाचे समन्वय व सनियंत्रण करण्यासाठी सर्व समावेशक शासन निर्णय निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होते.

**शासन निर्णय-**

अनैतिक व्यापारास प्रतिबंध करण्याकरिता उपरोक्त संदर्भ क्र.१ ते ५ येथील सर्व शासन निर्णय अधीक्रमीत करुन आता या शासन निर्णयाद्वारे अपर मुख्य सचिव (गृह) यांच्या अध्यक्षतेखाली पुढील प्रमाणे सर्व समावेशक राज्यस्तरीय सनियंत्रण व सल्लागार समितीची स्थापना करण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| १. | अपर मुख्य सचिव (गृह), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई | अध्यक्ष |
| २. | प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| ३. | प्रधान सचिव (विशेष), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| ४. | प्रधान सचिव, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई. | सदस्य |
| ५. | प्रधान सचिव, कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, मंत्रालय, मुंबई. | सदस्य |
| ६. | प्रधान सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| ७. | प्रधान सचिव, कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| ८. | प्रधान सचिव, विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| ९. | विशेष पोलीस महानिरीक्षक, महिला अत्याचार प्रतिबंध विभाग, महाराष्ट्र राज्य, मुंबई | सदस्य |
| १०. | आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे | सदस्य सचिव |
| ११. | मानवी वाहतुकीविरुध्द लढा देणाऱ्या ३ ते ६ स्वयंसेवी संस्था (प्रयास, मुंबई, इंटरनॅशनल जस्टीस मिशन, मुंबई, जस्टीस ॲन्ड केअर, मुंबई, प्रेरणा, रेस्क्यू फाऊंडेशन, स्त्री आधार केंद्र) | सदस्य निमंत्रित |
| १२. | युनिसेफचे प्रतिनिधी, मुंबई | सदस्य निमंत्रित |
| १३. | अध्यक्ष, सनियंत्रण समिती, देवनार | सदस्य निमंत्रित |
| १४. | राज्य समन्वयक, पी.पी.एम.यू, महिला व बाल विकास | सदस्य निमंत्रित |
| १५. | टाटा सामाजिक विज्ञान संस्था चे प्रतिनिधी | सदस्य निमंत्रित |

**समितीचे उद्दीष्ट :-**

(१) बाजारु लैंगिक शोषण व अनैतिक मानवी वाहतुकीवर केलेल्या प्रतिबंधात्मक कारवाईचा आढावा घेणे.

(२) १६ वर्षाखालील बालकांचा (मुली/मुले) बाजारु लैंगिक शोषण व अनैतिक मानवी वाहतूकीत होणाऱ्या वापराबाबत प्रतिबंध करण्यासंबंधीच्या कार्यवाहीचा आढावा घेणे.

(३) बाजारु लैंगिक शोषण व अनैतिक मानवी वाहतुकीतून सुटका केलेल्या महिला /अल्पवयीन मुले/मुलींचे पुनर्वसन करण्यासाठी राबविण्यात येणाऱ्या योजनांचा आढावा घेणे.

(४) अनैतिक मानवी वाहतुक प्रतिबंध कायदा, १९५६ ची अंमलबजावणी प्रभावीरीत्या होण्यासाठी उपाययोजना सूचविणे.

(५) राज्य कृती आराखडा तयार करणे.

(६) अनैतिक व्यापारातून अल्पवयीन मुलींची सुटका करताना व सुटका संदर्भात उपाययोजना सुचविणे.

(८) सुटका करण्यात आलेल्या मुली/ महिलासंदर्भात उपाययोजना सुचविणे.

२. सदर समितीची बैठक दर तीन महिन्यांनी घेण्यात येईल.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०१७०७२७१७०८४०६८२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

V. M. Bhat

Digitally signed by V. M. Bhat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5f0272b97156a5d2812bad6725ca46fb2671d1da08208cfdd6677fac0afd6bf2, cn=V. M. Bhat
Date: 2017.07.27 17:15:57 +05'30'

**( व्यं. मा. भट )**
उप सचिव, गृह विभाग, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा. अध्यक्ष,महाराष्ट्र विधानसभा, मुंबई.
४) मा. उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, मुंबई.
५) मा. सभापती,महाराष्ट्र विधानपरिषद, मुंबई.
६) मा. उप सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, मुंबई.
७) मा. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानसभा, मुंबई.
८) मा. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानपरिषद, मुंबई.

९) अपर मुख्य सचिव (गृह), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०) प्रधान सचिव (विशेष), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
११) प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई
१२) प्रधान सचिव, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३) प्रधान सचिव, कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४) प्रधान सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५) प्रधान सचिव, कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६) प्रधान सचिव, विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई
१७) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१८) अपर पोलीस महासंचालक,गुन्हे अन्वेषण विभाग, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१९) विशेष पोलीस महानिरीक्षक, महिला अत्याचार प्रतिबंध विभाग, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२०) आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे.
२१) अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य महिला आयोग, म्हाडा बील्डींग, बांद्रा (पूर्व), मुंबई.
२२) राज्य प्रतिनिधी, युनिसेफ, १९, पारसी पंचायत रोड, अंधेरी (पूर्व), मुंबई-६९.
२३) संचालक, प्रयास, १/९, बीडीडी चाळ, पोदार कॉलेजच्या मागे, वरळी, मुंबई.
२४) इंटरनॅशनल जस्टीस मिशन (आय.जे.एम.), सांताक्रुज (पूर्व), विद्यानगरी, पोस्ट बॉक्स क्र.१९७५८, मुंबई-९८.
२५) संचालक, जस्टीस ॲन्ड केअर, मुंबई.
२६) संचालक, प्रेरणा, कामाठीपुरा म्यूनिसीपल हायस्कूल, ७ वी गल्ली, शुक्ला स्ट्रिट, मुंबई-८.
२७) संचालक, रेस्क्यू फाऊंडेशन, प्लॉट नं.३९, फातिमा बिबी लेन, अवर लेडी ऑफ रेमेडी चर्च मागे, पोईसर, कांदीवली (प.), मुंबई-६७.
२८) अध्यक्ष, स्त्री आधार केंद्र, ओम शिवधाम को.ऑ.हौ.सोसायटी, ए विंग, प्लॉन नं.२०१, २रा मजला, माहूल रोड, चेंबूर, मुंबई-७४.
२९) अध्यक्ष, सनियंत्रण समिती, देवनार.
३०) टाटा सामाजिक विज्ञान संस्था, मुंबई.
३१) राज्य समन्वयक, पी.पी.एम.यू, महिला व बाल विकास
३२) निवड नस्ती/विशा-६.